**अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ च्या अनुषंगाने केंद्र शासनाने अपंगांच्या पदनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे) यांच्या आस्थापनेवरील गट ब, गट क व गट ड मधील पदांवर शारीरिकदृष्टया अपंगांसाठी सुयोग्य पदे निश्चित करणे बाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**
**शासन निर्णय क्रमाकः संकिर्ण-२०१०/२९६२/प्र.क्र.७०/१०/मंउका**
**मंत्रालय, मुंबई-३२**
**दिनांकः १३ जानेवारी, २०११.**

**संदर्भः-** १) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-१०९९/प्र.क्र. ३७/९९/१६-अ दि.०५.०३.२००२.
३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग(उपाहारगृहे) क्रमांकः- संकिर्ण-१००३/ ५२६/मंउका/२, दि.८ जुलै,२००८
४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रं.न्यायाप्र-२००९/ प्र.क्र.५/सुधार-३, दिनांक ३ ऑगस्ट,२०१०

**प्रस्तावनाः-**

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण ) अधिनियम १९९५, दि.०७ फेब्रुवारी,१९९६ पासून लागू झाला आहे. या कायदयान्वये अपंगांच्या सर्वांगिण विकासासाठी व त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी शासन सेवेत ३ टक्के पदे आरक्षित करण्याची तरतूद आहे. त्यानुसार सरळ सेवा भरतीच्या पदांवर अपंगांना आरक्षण विहित करणे/सूट देणे या संदर्भात याचिका क्र.१२९/०३ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार व पुनर्रचित तज्ञ समितीने केलेल्या सुधारणानुसार मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील गट-ब ते गट-ड संवर्गातील सरळ सेवेने भरावयाच्या पदांसाठी संदर्भ क्र.३ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. आता अपंग व्यक्तींसाठी सुधारित पदनिश्चिती करण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय , मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्र.२२५/२००९ मध्ये मा.उच्च न्यायालयाने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अपंगांसाठी पदे सुनिश्चित करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरुन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भाधिन अ.क्र.४ अन्वये असे कळविले आहे की, केंद्र शासनाने अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील तरतुदीस अनुसरुन त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी पदे निश्चित करुन यादी प्रसिध्द केली आहे. केंद्र शासनाच्या सदर यादीनुसार राज्य शासनाच्या अखत्यारितील शासकीय व निमशासकीय आस्थापेनवरील जी पदे समान आहेत ती पदे संबंधित विभागांनी अपंगांसाठी निश्चित करण्यासाठी आदेश निर्गमित करावेत.

२. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील गट-ब ते गट-ड संवर्गातील पदांबाबत अंपगांसाठी आरक्षण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

(कृमाप)

**शासन निर्णयः-**

संदर्भाधिन अ.क्र.३ येथील दि.८.०७.२००८ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढील प्रमाणे सुधारित आदेश देण्यात येत आहेत.

२. अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ मधील तरतूदीनुसार केंद्र शासनाने ज्या यादीन्वये त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील जी पदे अपंग व्यक्तींसाठी आरक्षण देण्यासाठी निश्चित केली आहेत त्या यादीशी तुलना करुन सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील गट ब, गट क व गट ड या संवर्गातील सरळसेवेने भरावयाच्या पदांसाठी (केंद्र शासनाच्या यादीतील समान पदे विचारात घेऊन) सोबत जोडलेल्या अनुक्रमे परिशिष्ठ- एक व दोन मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे अपंगांसाठी पदे निश्चित करण्यात येत आहेत.

३. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५, या अधिनियमातील कलम ३२ व ३३ अनुसार सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील गट-ब ते गट-ड या संवर्गातील पदांवरील सरळसेवा भरतीमध्ये किमान ४० टक्के अपंगत्व असलेल्या अंध/अल्पदृष्टी,कर्णबधीर व अस्थिव्यंग या प्रवर्गातील अपंग व्यक्तींसाठी प्रत्येकी १ टक्का याप्रमाणे ३ टक्के आरक्षण लागू राहील. तसेच गट-क व गट-ड मध्ये सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०५.०३.२००२ च्या शासन निर्णयाप्रमाणे पदोन्नतीमध्ये आरक्षण लागू राहील.

४. हा शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. २/सुधार-३, दि.१२.०१.२०११ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र.२०११०११३१५५८५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(श्री.प्र.पाटील)
सह सचिव,महाराष्ट्र शासन

**सोबतः**-परिशिष्ट-एक व दोन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
३. मा.उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
४. मा.राज्यमंत्री, (सामान्य प्रशासन) यांचे खाजगी सचिव,
५. आयुक्त, अपंग कल्याण, ३, चर्च रोड, पुणे
६. उप सचिव, सा.न्या. व वि.स.विभाग (सुधार-३)
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, का.१६-अ/१९-अ, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती.

**परिशिष्ट-एक**

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग(उपाहारगृहे), क्रमांकःसंकीर्ण-२०१०/२९६२/प्र.क्र.७०/१०/मंउका, दि. १३.०१.२०११, सोबतचे जोडपत्र)

शारीरिकदृष्टया अपंग व्यक्तिकरीता मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापेनवरील सुयोग्य पदे.

| अ.क्र. | पदनाम | शारीरिक योग्यता | सुयोग्य पदासाठी अपंगत्वाचा संवर्ग | पदाची कर्तव्ये व जबाबदा-या | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| गट -ब (राजपत्रित) | | | | | |
| १ | महाव्यवस्थापक | MF,S,H,RW,ST,W | OL,BL,OA, LV | सर्व आहार/उपाहारगृहांचे कार्यालय प्रमुख, कोकण भवन उपाहारगृहाचे नियंत्रक अधिकारी. | एकाकी पदोन्नतीचे पद |
| गट -ब (अराजपत्रित) | | | | | |
| २ | मुख्य लिपिक | S,RW,SE,MW,C | OL,BL,OA,LV,B,HH | सर्व आहार/उपाहारगृहांशी संबंधीत आस्थापना /सेवा विषयक सर्व कामे. शासनाकडे पाठविण्यासाठी प्रस्ताव तयार करणे. महाव्यवस्थापकांनी सोपविलेली कामे. | एकाकी पदोन्नतीचे पद |
| ३ | सहाय्यक लेखा अधिकारी, सहा लेखा परिक्षा अधिकारी | S,BN,SE,RW,MF,H,C | OL,BL,OA, HH | उपाहारगृहांची लेखा विषयक कामे अंदाज पत्रक तयार करणे , वेतन निश्चिती, उपाहारगृहांच्या भांडारांच्या लेख्यांची अंतर्गत लेखा तपासणी, महाव्यवस्थापकांनी सोपविलेली कामे. | राज्य वित्त व लेखा सेवा वर्गातील बदलीने नियुक्तीची पदे |
| ४ | व्यवस्थापक,मंत्रालय/ विधान भवन/कोकण भवन | MF,S,H,RW,ST,W | OL,OA,BL,LV | उपाहारगृहाच्या व्यवस्थापनाचे संपूर्ण कामकाज पहाणे व नियंत्रण ठेवणे.महाव्यवस्थापकांनी सोपविलेली कामे. | -- |

| गट -क (अराजपत्रित) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५ | वरिष्ठ भांडारपाल | S,H,RW,W | OL,OA,LV,HH | उपाहारगृहांच्या भांडारासाठी निविदा प्रक्रीया प्रकरण सादर करणे. यंत्र सामुग्री/कच्चा माल खरेदी प्रस्ताव तयार करणे, जडवस्तु नोंद वहया अद्यावत ठेवणे, मालाचा दर्जा तपासून घेणे,महाव्यवस्थापका/मुख्यलिपिकांनी सोपविलेली कामे. | -- |
| ६ | उप लेखापाल | S,BN,SE,RW,MF,H,C | OL,OA,BL, HH | सर्व उपाहारगृहांशी संबंधीत सवानिवृत्ती प्रकरणे, गट विमा याजना, वैद्यकीय खर्चाची प्रकरणे सादर करणे,चारस आहारगृहाची रजा मंजूरी, भनिनि प्रकरणे,महाव्यवस्थापका/मुख्य लिपिकांनी सोपविलेली कामे. | -- |
| ७ | वरिष्ठ लिपिक | S,ST,W,RW,H,C | OL,BL,OA,OAL,LV,B, HH | सर्व उपाहारगृहांशी संबंधीत घर बांधणी अग्रिम प्रकरणे, ठेव संलग्न विमा योजना प्रकरणे सादर करणे. मंत्रालय उपाहारगृहाचे रजा लेखे व आदेश काढणे सेवाज्येष्ठता याद्या तयार करणे व मुख्य लिपिकास सहाय्य करणे इ. | -- |
| ८ | व्यवस्थापक, चौरस आहारगृह | MF,S,H,RW,ST,W | OL,OA,BL.LV | चौरस आहारगृहाच्या व्यवस्थापनाचे संपूर्ण कामकाज पहाणे व नियंत्रण ठेवणे.महाव्यवस्थापकांनी सोपविलेली कामे. | -- |
| ९ | उप व्यवस्थापक,मंत्रालय /कोकण भवन उपाहारगृह | MF,S,H,RW,ST,W | OL,OA,BL.LV | व्यवस्थापकांना सर्व कामामध्ये संपूर्णपणे सहाय्य करणे.महाव्यवस्थापक/व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे. | -- |
| १० | सहा.व्यवस्थापक,मंत्रालय /कोकण भवन/विधान भवन उपाहारगृह | MF,S,H,RW,ST,W | OL,OA,BL.LV | व्यवस्थापक/उप व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे करणे/सहाय्य करणे. व्यवस्थापक/उपव्यवस्थापकांनी सोपविलेली कामे. | -- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ११ | रोखपाल, चौरस आहारगृह/कोकण भवन उपाहारगृह | S,W,MF,SE,RW,H,C | OL,OA,BL.MW | उपाहारगृहातून होणा-या वस्तूंच्या विक्रीची रक्कम ताब्यात घेणे, बॅंकेत जमा करणे, संबंधित लेखे ठेवणे व अन्य देयकांची रक्कम व धनादेश अदा करणे, महाव्यवस्थापक/मुख्यलिपिकांनी सोपविलेली कामे. | प |
| १२ | देयक लेखापाल,मंत्रालय / चारस उपाहारगृह, लेखा लिपिक कोकण/विधान भवन उपाहारगृह | S,W,MF,SE,RW,H,C | OL,BL,MW,LV,HH | वेतन व अन्य देयके तयार करणे, सवा पुस्तके अद्यावत ठेवणे.भनिनि लेखे ठेवणे.महाव्यवस्थापक/मुख्यलिपिकांनी सोपविलेली कामे. | -- |
| १३ | भांडारपाल,मंत्रालय /चौरस/कोकण भवन / विधान भवन उपाहारगृह | S,ST,W,L,PP,MF,SE, RW | OL, HH | उपाहारगृहांसाठी खरेदी करण्यात येणारा कच्चा माल नमुन्यानुसार तपासून स्विकारणे, कच्चा मालाचा उपाहारगृहांना मागणी नुसार पुरवठा करणे व संबंधित लेखे ठेवणे,महाव्यवस्थापक/वरिष्ठ भांडारपालांनी सोपविलेली कामे. | -- |
| १४ | लिपिक / लिपिक टंकलेखक | S,ST,W,MF,SE,RW,H | OA,OL,OAL,BL,B,LV, HH | आवक जावक नाद व ठेवणे, पोस्टाचा स्टॅंप लेखा ठेवणे, टंकलेखन करणे, नस्त्या व अभिलेख यांचे जतन करणे, उधार विक्री लेखे/नोदीठेवणे.महाव्यवस्थापक/मुख्यलिपिकांनी सोपविलेली कामे. | -- |

वरील तक्यात इंग्रजी भाषेत अपंगत्वाच्या प्रकारासाठी वापरण्यात आलेली ॲब्रीव्हिएशन्स खालीलप्रमाणे आहेत.

B= Blind, LV=Low Vision, HH= Hearing Handicapped, OA=One Arm, OL=One Leg, BL=Both Leg, OAL=One arm & One Leg, MW=Muscular Weakness

## परिशिष्ट-दोन

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे), क्रमांक:संकीर्ण-२०१०/२९६२/प्र.क्र.७०/१०/मंउका, दि.१३.०१.२०११ चे सोबतचे जोडपत्र)

शारिरिकदृष्टया अपंग व्यक्तिकरीता मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील सुयोग्य पदे.

| अ.क्र. | पदनाम | शारीरिक योग्यता | सुयोग्य पदासाठी अपंगत्वाचा संवर्ग | पदाची कर्तव्ये व जबाबदा-या | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **गट-ड (अराजपत्रित)** | | | | | |
| १ | कुपन विक्रेता | S,ST,W,MF,SE, RW,C | OA,OL,BL,HH | खाद्य पदार्थांच्या विक्रीची कुपन विकणे व त्यांचा लेखा ठेवणे, रोख रक्कम रोखपालाकडे जमा करणे.व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे. | -- |
| २ | मुख्य आचारी | S,ST,W,MF, SE, RW,H | OL,LV, HH | मागणीनुसार खाद्य पदार्थ तयार करणे, आचा-यांना मार्गदर्शन करणे.व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| ३ | आचारी | S,ST,W,MF, SE, RW,H | OL,LV, HH | मागणीनुसार खाद्य पदार्थ तयार करणे, मुख्य आचा-यास सहाय्य करणे.व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| ४ | चहा विशेषज्ञ | S,ST,W,MF, SE, RW,H | OL,LV, HH | मागणीनुसार चहा तयार करणे व चहाचा दर्जा राखणे.व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| ५ | सहा.आचारी | S,ST,W,F,PP, L,KC,B,SE,H | OL,LV, HH | मुख्य आचारी/आचारी यांना सहाय्य करणे.व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | चहा बणविणार | S,ST,W,F,PP, L,KC,B,SE,H | OL,LV,B, HH | चहा विशेषज्ञ यांना सहाय्य करणे.व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| ७ | पर्यवेक्षक | S,ST,W,MF, SE, RW,H | OL,LV, HH | मागणीनुसार चहा व खाद्यपदार्थांचा पुरवठा करणे, त्यावर नियंत्रण ठेवणे, लेखा ठेवणे, उधार विक्रीची देयके जमा करणे,व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| ८ | सफाईगार | S,ST,W,KC,F,PP,L, SE | OL,LV, HH | उपाहारगृहातील भांडी ,साधन सामुग्री व उपाहारगृहाची साफ सफाई करणै,व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| ९ | वेटर/ बॉयवेटर | S,ST,B,SE,H, RW | OL,LV, HH | तयार खाद्य पदार्थ पुरवविण्यासंदर्भातील पूर्व तयारी करणे व ग्राहकांना सर्व सेवा देणे व उपाहारगृह स्वच्छ ठेवणे.व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| १० | वाढपी | S,ST,B,SE,H, RW | OL,LV, HH | चौरस आहारगृहामध्ये दररोज लागणारी भाजी कापणे, कोशिंबीर तयार करणे व प्रत्यक्ष भोजन पदार्थांचे थाळींमध्ये वाटप करणे,व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |
| ११ | हमाल | S,ST,L,BN,PP, MF,SE,H | OL,LV, HH | कच्चे सामान/तयार पदार्थांची ने -आण करणे, ताट वाटया उचलणे ,व्यवस्थापकांनी सोपविलेली कामे | -- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १२ | शिपाई | S,ST,W,F,PP, L,KC,B,SE,H | OL,OA,LV,B, HH | देयके अधिदान व लेखा कार्यालयास सादर करणे, धनादेश आणने, टपाल/नस्त्या पोहचविणे, कार्यालयातील कागदपत्रे/नस्त्या संबंधित अधिका-यांकडे पोहचविणे,महाव्यवस्थापक/ मुख्यलिपिकांनी सोपविलेली कामे | -- |

वरील तक्यात इंग्रजी भाषेत अपंगत्वाच्या प्रकारासाठी वापरण्यात आलेली अॅब्रीव्हिएशन्स खालीलप्रमाणे आहेत.

B= Blind, LV=Low Vision, HH= Hearing Handicapped, OA=One Arm, OL=One Leg, BL=Both Leg, OAL=One arm & One Leg, MW=Muscular Weakness